**राज्यातील उच्चदाब उपसा जलसिंचन योजनांना वीज दरात सवलत देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र. ३८२ /ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ३१ जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दिनांक ११.१०.२०१२ नुसार राज्य शासनाकडून कृषीग्राहकांना वीजदरात सवलत देण्यात येते. त्यापोटी होणाऱ्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी शासनाकडून प्रति युनिट देण्यात येणाऱ्या अनुदानाची मर्यादा कायम ठेवण्यात आली होती. त्यानुसार ऑगस्ट, २०१२ नंतर वीजदरात होणारी वाढ कृषीपंपधारकांनी भरावयाची आहे. त्यामुळे त्यानंतर वीजदरात होणाऱ्या वाढीचा भार ग्राहकांकडून वसूल करण्यात येत आहे.

२. ऑगस्ट, २०१२ पासून उच्चदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांना वीजदर सवलत देण्याकरिता रुपये २.१६ प्रति युनिट शासनामार्फत महावितरण कंपनीस अनुदान देण्यात येते. महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने महावितरण कंपनीच्या ग्राहकांसाठी जून-२०१५, नोव्हेंबर-२०१६, एप्रिल-२०१७, एप्रिल-२०१८ व सप्टेंबर-२०१८ मध्ये नवीन वीजदर आदेश लागू केले आहेत. सदर वीजदर आदेशानुसार उच्चदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांच्या वीजदरात वाढ झाली. दिनांक २६.०६.२०१५ च्या वीजदर आदेशानूसार उच्चदाब उपसा जलसिंचन ग्राहकाने भरावयाचा वीजदर हा रुपये १.१६ प्रति युनिट इतका होता. याच दराने नोव्हेंबर, २०१६ पासून मार्च, २०२० पर्यंत वीज देयके देण्याबाबत राज्यातील उच्चदाब उपसा जलसिंचन सहकारी संस्थांची मागणी होती. याबाबतचा प्रस्ताव दिनांक २९.०१.२०१९ च्या मंत्रीमंडळ बैठकीत सादर करण्यात आला होता. त्यावर मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

१. राज्यातील उच्चदाब उपसा जलसिंचन योजनांना रुपये १.१६ प्रती युनिट हा सवलतीचा वीजदर दिनांक १ नोव्हेंबर, २०१६ ते मार्च, २०२० पर्यंत कायम ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. यापोटी महावितरण कंपनीवर पडणाऱ्या आर्थिकभाराची प्रतिपूती अंदाजे रुपये १०७.७३ कोटी शासनामार्फत अर्थसहाय्याच्या स्वरुपात महावितरण कंपनीस देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. मार्च, २०२० नंतर सदर सवलतीबाबत ऊर्जा विभागामार्फत आढावा घेण्यात येईल.

३. उपरोक्त निर्णयानुसार महावितरण कंपनीने कार्यवाही करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौ.संदर्भ क्र. २६/१९/व्यय-१६ दिनांक ३१.०१.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९०१३११५५६४२२४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BHIMASHANKAR YALLAPPA MANTA

Digitally signed by BHIMASHANKAR YALLAPPA MANTA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, postalCode=400032, street=GOVERNMENT OF MAHARASHTRA,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=aa263c6e4b287b249819a6233cf718b1f9c2edc473ecaa592812fbda1f060335, ou=ENERGY DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BHIMASHANKAR YALLAPPA MANTA
Date: 2019.01.31 16:07:54 +05'30'

**( भि. य.मंता )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सर्व मंत्रालयीन विभाग
९) सचिव,महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं. १, १३वा मजला, कफ परेड, मुंबई ०५.
१०) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
१२) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१५) अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) कक्ष अधिकारी (१४६१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.